राज्य शासकीय मृत कर्मचारी/निवृत्तिवेतनधारक यांच्या अपत्यांना जन्मक्रमानुसार कुटुंब निवृत्तिवेतन देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांक: कुनिवे-१०९१/५३/सेवा-४,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक २४ सप्टेंबर, १९९१.

## शासन निर्णय

दिनांक ११ जुलै १९९१ पूर्वी अस्तित्वात असलेल्या महाराष्ट्र नागरी सेवा [निवृत्तिवेतन] नियम, १९८२ च्या नियम ११६, पोटनियम [७], खंड [३] अनुसार जर मुलगे आणि अविवाहित मुली हयात असतील तर, मुलगे कुटुंब निवृत्तिवेतन मिळण्यास अपात्र होईपर्यन्त अविवाहित मुली कुटुंब निवृत्तिवेतन मिळण्यास पात्र ठरत नव्हत्या. मृत शासकीय कर्मचा-यांच्या/निवृत्तिवेतन-धारकांच्या अपत्यांना, ते मुलगे आहेत अथवा मुली हे लक्षात न घेता त्यांच्या जन्मक्रमानुसार कुटुंब निवृत्तिवेतन प्रदान करण्याबाबतच्या प्रश्नावर शासनाने अलिकडे विचार केला. शासनाने असा निर्णय घेतला आहे की, मृत शासकीय कर्मचा-यांचे/निवृत्तिवेतनधारकांचे पात्र मुलगे/मुली [महाराष्ट्र नागरी सेवा [निवृत्तिवेतन] नियम, १९८२ मधील नियम ११६[५] खालील परंतुकामध्ये नमूद केलेली मनोविकृती किंवा मानसिक दुर्बलता इत्यादी असलेली अपत्ये धरुन], ते मुलगे आहेत अथवा मुली हे लक्षात न घेता त्यांच्या जन्मक्रमानुसार कुटुंब निवृत्तिवेतनास पात्र राहतील आणि जोपर्यन्त मोठे अपत्य कुटुंब निवृत्तिवेतनास अपात्र होणार नाही तोपर्यन्त त्याच्या नंतरचे अपत्य कुटुंब निवृत्तिवेतनास पात्र ठरणार नाही. जेथे जुळ्या अपत्यांना कुटुंब निवृत्तिवेतन प्रदेय असेल तेथे ते त्या अपत्यांना सम प्रमाणात दिले जाईल. अशा अपत्यापैकी कोणत्याही अपत्याची कुटुंब निवृत्तिवेतनासाठी पात्रता संपुष्टात आल्यानंतर त्याचा/तिचा हिस्सा व्यपगत न होता तो अशा दुस-या अपत्यास प्रदेय राहील आणि अशी दोन्ही अपत्ये कुटुंब निवृत्तिवेतनास अपात्र झाल्यानंतर कुटुंब निवृत्तिवेतन यथास्थिती, पुढील पात्र अपत्यास किंवा जुळ्या अपत्यांना प्रदेय राहील.

२. हे आदेश ११ जुलै १९९१ पासून, म्हणजेच ज्या दिनांकाला महाराष्ट्र नागरी सेवा [निवृत्तिवेतन] नियम, १९८२ च्या नियम ११६ ला आवश्यक ती सुधारणा करणारी समक्रमांकाची दिनांक १ जुलै १९९१ ची अधिसूचना राजपत्रात प्रसिध्द झाली त्या दिनांकापासून अंमलात येतील.

३. या आदेशाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अ. ना. कुलकर्णी,
शासनाचे उप सचिव.

प्रति,

महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता]-१, महाराष्ट्र, मुंबई [८० प्रती],
महालेखापाल [लेखा परीक्षा]-१, महाराष्ट्र, मुंबई [८० प्रती],
महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता]-२, महाराष्ट्र, नागपूर [४० प्रती],
महालेखापाल [लेखा परीक्षा]-२, महाराष्ट्र, नागपूर [४० प्रती],
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई [४० प्रती],
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई [५ प्रती],
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
मंत्रालयातील सर्व विभाग,
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
वित्त विभागातील सर्व कार्यासने [ग्रंथपाल ५ प्रती],
निवड नस्ती, कार्यासन सेवा-४.

---

* पत्राद्वारे.

एप-५७१[१२००० + १०-९-९१]-१३

**Grant of Family Pension in the Order of birth to the children of the deceased State Government Employees/ Pensioners.**

GOVERNMENT OF MAHARASHTRA
Finance Department,
Resolution No. PEN-1091/53/SER-4,
Mantralaya, Bombay-400 032, Dated 24th September 1991.

## RESOLUTION

According to Rule 116(7)(iii) in the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982, as it existed prior to 11th July 1991, if male children and unmarried female children were alive, the unmarried female children were not eligible for Family Pension unless the male children became ireligible to receive the same. The matter regarding grant of Family Pension in the order of birth to the children of the deceased State Government employees/pensioners, irrespective of the sex of the child was recently considered by Government and accordingly it has been decided that the eligible male/female children (including the male/female children suffering from the disorder or disability of mind etc., referred to in the proviso of sub-rule (5) of Rule 116 of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982) of the deceased State Government employees/pensioners will now be entitled to Family Pension in the order of their birth, irrespective of the sex of the child and the younger of them will not be eligible for the Family Pension, unless the elder above him or her becomes ineligible for the grant of family pension. In cases, where the family pension is payable to twin children, the same will be payable to such twin children in equal shares. In the event of any of such children ceasing to be eligible for family pension, his/her share of Family Pension will not lapse but will become payable to the other such child and when both such children become ineligible for family pension the Family Pension will become payable to the next eligible single child or twin children, as the case may be.

2. These orders take effect from 11th July 1991, i.e. the date of publication of the Notification of even number dated 1st July 1991 amending Rule 116 of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982 in the official gazette.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

A. N. KULKARNI,
Deputy Secretary to Government.

---

R-579(12000+10_9_91)_2